**शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी**
**विशेष मदतीचा कार्यक्रम राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय- २०१५/ प्र.क्र.११९/म-७ (भाग -२)**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २४ जुलै, २०१५

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यातील मागील २-३ वर्षातील दुष्काळ, गारपीट, अवकाळी पाऊस इत्यादि नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित शेतक-यांच्या आत्महत्या विचारात घेऊन त्या रोखण्यासाठी क्षेत्रिय कार्यक्रमात अमुलाग्र बदल करुन कुटुंबनिहाय उपाययोजनांसाठी परिणामकारक असे नवीन पॅकेज तयार करणे, तसेच आत्महत्याग्रस्त क्षेत्रातील नैराश्याने ग्रासलेल्या शेतकऱ्यांचे मनोबल उंचावणे / अशा शेतकऱ्यांना नैराश्यातून बाहेर काढणे / त्यांच्यामध्ये जगण्यासाठीचा आत्मविश्वास निर्माण करणे यासाठी क्षेत्रिय स्तरावरून विविध उपाययोजना करणे आवश्यक आहे. त्यानुसार आत्महत्याग्रस्त क्षेत्रासाठी जिल्हास्तरीय / ग्रामस्तरीय समित्या, बळीराजा चेतना अभियान राबविणे, पथदर्शी प्रकल्पांतर्गत यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्यातील उप विभागासाठी नेमलेल्या सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या प्रस्तावास कार्योत्तर मंजूरी देणे व वरील दोन जिल्ह्यांसाठी शेतकरी आत्महत्याबाबतचे कामकाज करण्याकरीता विशेष कक्ष स्थापन करणे इत्यादी बाबी शासनाच्या विचाराधिन होत्या.

**शासन निर्णय :-**

शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी पथदर्शी प्रकल्प म्हणून विशेष मदतीचा कार्यक्रम राबविणेबाबत खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

२. पथदर्शी प्रकल्पांतर्गत शासनाने शेतकऱ्यांच्या आत्महत्या होणाऱ्या जिल्ह्याकरीता विविध उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्याची निवड केलेली असून त्याअंतर्गत खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येत आहेत.

**२.१ जिल्हास्तरीय समिती**

जिल्हास्तरीय समितीची रचना व कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे.

**जिल्हास्तरीय समितीची रचना:-**

१) जिल्हाधिकारी - अध्यक्ष
२) पोलीस अधिक्षक
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
४) उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (पंचायत)
५) उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (म.बा.क.)
६) जिल्हा समाजकल्याण अधिकारी
७) जिल्हा कृषी अधिकारी
८) जिल्हा शल्य चिकित्सक
९) जिल्हा आरोग्य अधिकारी
१०) जिल्हा उप निबंधक
११) निवासी उप जिल्हाधिकारी- सदस्य सचिव

**समितीची कार्यकक्षा :-**

१) त्रस्त कुटुंब ओळखण्यासाठी ग्रामस्तरीय समितीमार्फत सर्वेक्षण करुन यादी बनविणे.

२) शेती विषयक शासकीय योजना, कमी खर्चाच्या कोरडवाहू शेतीबाबत माहिती सर्व गावांमध्ये देणे.

३) सामूहिक विवाहाचे महत्व, व्यसनमुक्ती इत्यादीबाबत भजन किर्तन , पथनाट्य या माध्यमातून सर्व गावांमध्ये माहिती देण्याचा उपक्रम राबविणे.

४) ग्राम स्तरावर नेमलेल्या समितीच्या कामकाजाचा नियमित आढावा घेणे.

५) त्रस्त कुटुंबातील प्रमुख व्यक्तीला समुपदेशन करण्याबाबतचे नियोजन व कार्यक्रम राबविणे.

६) जिल्हा शल्यचिकित्सक यांचे मार्फत ठराविक कालांतराने गावोगावी स्वास्थ्य शिबीरे आयोजित करून मानसोपचार तज्ज्ञांची तसेच समाजसेवकांची सेवा या शिबीरात उपलब्ध करून देणे.

७) यादीतील कुटुंबाना पात्रतेनुसार संजय गांधी निराधार योजना, अन्नसुरक्षा योजना इत्यादी योजनांचा वैयक्तिक लाभ मिळेल याचा खात्री करणे.

८) जिल्हा कृषी अधिकारी यांनी शेतकऱ्यांना आधुनिक पद्धतीने कमी खर्चाचा व कमीत कमी पाणी वापरून जास्तीत जास्त पीक घेण्याबाबतचे शेती विषयक प्रशिक्षणाचे कार्यक्रम प्रत्येक गावात राबवावेत.

९) केंद्र सरकार तसेच राज्य शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध शेती विषयक योजनांची / सोयी सवलतींबाबतची माहिती शेतकऱ्यांना अवगत करून देऊन त्यांचा लाभ जास्तीत जास्त शेतकऱ्यांना होईल याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

१०) सदर समितीस त्यांच्या जिल्हयात असलेल्या सेवाभावी संस्था, ट्रस्ट, कंपन्या, उदयोग संस्था इत्यादी कडून CSR द्वारे निधी उभा करण्यास व त्याचा वापर वरील बाबींसाठी करण्याचे अधिकार राहतील.

११) प्रत्येक शेतकरी सहकारी सोसायटीचा सभासद होण्यास प्रवृत करण्यासाठी सभासद मोहीम राबविणे.

वरील जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी यवतमाळ व उस्मानाबाद जिल्हा समितीकडे दरवर्षी रु.१० कोटी निधी(untied) उपलब्ध करुन देण्यात येईल. यातील १० % रक्कम आवश्यकतेनुसार घ्यावयाच्या कंत्राटी करारावरील कर्मचाऱ्यांच्या खर्चासह प्रशासकीय खर्चासाठी असेल. सदर निधीचा वापर समितीने गावातील भजनी मंडळ, किंर्तन इत्यादी रुढी/परंपरा यांच्या पुनरुज्जीवन करण्याकरिता करावा. याबाबत मार्गदर्शक सुचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

## २.२ ग्रामस्तरीय समिती

ग्रामस्तरीय समितीची रचना व कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे.

**ग्रामस्तरीय समितीची रचना:-**

१) अध्यक्ष - सरपंच

२) गावातील चार प्रतिष्ठीत व्यक्ती व तीन महिला

३) गावात असल्यास माजी सैनिक / वकील / डॉक्टर
४) गावातील दोन शेतकरी
५) गावातील महिला बचत गटाची अध्यक्षा
६) तलाठी
७) पोलीस पाटील
८) अंगणवाडी सेविका
९) आशा कार्यकर्ती
१०) कृषी सहाय्यक
११) ग्राम सेवक - सदस्य सचिव

**समितीची कार्यकक्षा :-**

१) नापिकी, कर्जबाजारीपणा व आर्थिक संकट इत्यादीने त्रस्त कुटुंबे ओळखणे व त्यांची यादी बनविणे, शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार गावातील सर्वात त्रस्त असे २-३ टक्के कुटुंबांच्या याद्या बनविण्याची जबाबदारी पुर्णपणे ग्रामस्तरिय समितीची असून जिल्हा किंवा राज्य पातळीवरून हस्तक्षेपही होणार नाही व जबाबदारीही घेतली जाणार नाही.
२) अशा त्रस्त कुटुंबाची कुवत नसल्यास गावातील लोकांच्या सहभागातुन पेरणी करुन घेणे.
३) समुपदेशनाच्या माध्यमातुन शेतकऱ्याला आत्महत्येपासुन परावृत्त करणे. आर्थिक, सामाजिक, कौटुंबिक इत्यादी विविध कारणास्तव नैराश्यग्रस्त शेतकरी व त्याच्या कुटुंबियांचे,सेवाभावी संस्था, सामाजिक संस्था, सामाजिक कार्यकर्ते व तत्सम प्रतिष्ठीत व्यक्तींच्या माध्यमातून समितीने प्रबोधन /समुपदेशन करण्याची योजना गावात राबविणे.
४) समितीने सणसुदीच्या वेळी शासन मान्य शाहीर, लोककलामंच, कलापथक अशा माध्यमातून करमणूकीचे कार्यक्रम आयोजित करून त्यातून शेतकऱ्यांचे सामाजिक आर्थिक इत्यादी समस्यांविषयी प्रबोधन करणे.
५) शेतकऱ्यांच्या मानसिक तणावमुक्तीसाठी विविध सेवाभावी संस्थेमार्फत तणावमुक्ती व व्यसन मुक्तीचे कार्यक्रम आयोजित करणे.
६) नियमितपणे कामकाज करून याबाबतचा अहवाल जिल्हास्तरीय समितीस सादर करणे.

राज्य शासनाकडून प्रत्येक गावाच्या समितीस रु १.०० लक्ष ठोक रक्कम उपलब्ध करण्यात येईल. सदर रकमेचा वापर आर्थिक संकटात असलेल्या कुटुंबाला सहाय्य करणेसाठी व आत्महत्या रोखण्यासाठी वापरण्याची मुभा राहील याबाबत मार्गदर्शक सुचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

### ३. बळीराजा चेतना अभियान

शेतकऱ्यांना धीर देऊन त्यांच्या मनामध्ये जगण्याची प्रेरणा निर्माण करुन त्यांना आत्महत्येपासून परावृत्त करण्यासाठी जिल्हास्तरावर समिती गठित करुन सदर समितीद्वारे बळीराजा चेतना अभियान राबविण्यात यावे.

बळीराजा चेतना अभियान समितीची रचना, समितीचे कार्य व बळीराज चेतना अभियानात समाविष्ट व्यक्तिंचा तपशील व अभियानाचे उद्दीष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत :-

**समितीची रचना :-**

| | | |
|---|---|---|
| १. पालक मंत्री | - | अध्यक्ष |
| २. अध्यक्ष, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ३. जिल्ह्यातील सर्व खासदार/आमदार | - | सदस्य |
| ४. जिल्हाधिकारी | - | सदस्य सचिव |
| ५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| ६. अप्पर जिल्हाधिकारी | - | सदस्य |
| ७. अधीक्षक कृषि अधिकारी | - | सदस्य |
| ८. उप विभागीय अधिकारी | - | सदस्य |
| ९. जिल्हा माहिती अधिकारी | - | सदस्य |
| १०. विशेष समाज कल्याण अधिकारी | - | सदस्य |
| ११. अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क | - | सदस्य |
| १२. जिल्हा पत्रकार संघाचे अध्यक्ष | - | सदस्य |
| १३. प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र. | - | सदस्य |
| १४. स्वयंसेवी संस्थांचे ३ प्रतिनिधी | - | सदस्य |
| १५. जिल्ह्यातील ३ प्रभावी व्यक्ती | - | सदस्य |
| १६. निवासी जिल्हाधिकारी | - | सदस्य |

**समितीचे कार्य :-**

१. अभियानावर देखरेख ठवणे.
२. अभियानाची प्रभावी अंमलबजावणी होण्याकरिता पूरक सूचना, शासन निर्णय, परिपत्रक गरजेनुसार निर्गमित करण्याची कार्यवाही करणे, अभियानाचे प्रचार प्रसार नियोजन व अंमलबजावणी करणे.
३. अभियानाच्या स्वरुपात आवश्यक ते बदल करणे.
४. अभियानात सहभाग घेतलेल्या व उल्लेखनीय कामगिरी केलेल्या व्यक्ती / संस्था यांना पारितोषकासाठी निवड करणे.
५. पारितोषक वितरण समारंभ आयोजित करून पारितोषक वितरित करणे.

**बळीराजा चेतना अभियानात समाविष्ट व्यक्ती व संस्था**

(१) यशोगाथा घडविणारे व सांगणारे शेतकरी.
(२) खंबीरपणे उभी राहीलेली आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांची पत्नी वा त्यांची मुले
(३) प्रवचनकार, नाटककार, गायक, पथनाट्य पथक, किर्तनकार, व्याख्याते इत्यादि.
(४) वृत्तपत्रे, नियतकालिकातून लिखाण करणारे, वृत्तपत्राचे स्तंभ लेखक.

(५) सामाजिक / सांस्कृतिक संस्था

**बळीराज चेतना अभियानाची उद्दीष्ट्ये**

(१) शेतक-यांचे मनोबल उंचावणे व शेतक-यांच्या मनामध्ये जगण्याची प्रेरणा निर्माण करणारे साहित्य निर्मितीला प्रोत्साहन देणे.

(२) अशा आशयाच्या बातम्या, लेखमाला लिहिणे, पत्रकार/लेखकांना प्रोत्साहन देणे.

(३) शेतकऱ्यांना जगण्याची प्रेरणा देणारी व्याख्याने, पथनाट्य, कथा कथन, किर्तनकार,नाटककार, प्रवचनकार यांना प्रोत्साहीत करुन अधिकाधिक कार्यक्रम घडवून आणणे.

(४) शेतकऱ्यांच्या मनामध्ये सकारात्मक विचार, लढावू वृत्ती वाढविण्याकरिता वातावरण निर्माण करणे.

४. यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्यातील जिल्हाधिकारी कार्यालयात अवर्षणामुळे बाधित शेतकऱ्यांचे कामकाज करण्याकरिता विशेष कक्ष स्थापन करण्यात यावा. सदर कक्ष किमान उप जिल्हाधिकारी अथवा जिल्हा कृषि अधिकारी यांचा अधिपत्याखाली ठेवून त्याकरिता आवश्यक कर्मचारीवृंद नेमण्यात यावा. हा कक्ष किमान ०३ वर्षाकरिता कार्यरत ठेवण्यात यावा.

५. यवतमाळ व उस्मानाबाद जिल्हयातील उपविभाग निहाय नेमण्यात आलेल्या सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांना शासन परिपत्रक क्रमांक एससीवाय-२०१५/प्र.क्र.१६९/म-७,दि. ०६.०५.२०१५ नुसार प्रदान केलेल्या अधिकारातील अ.क्र. १ व २ वगळण्यात येत आहेत. तसेच महिन्यातुन एकदा अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली या सर्व सचिवांच्या समितीची बैठक घेऊन अस्तिवात असलेल्या शासन निर्णय / परिपत्रक इत्यादी मध्ये काही बदल करण्याची आवश्यकता असल्यास तसे संबंधीत विभागास सुचवेल व त्यानुसार बदल करणे संबंधीत प्रशासकीय विभागावर बंधनकारक राहील.

६. यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्यातील वरीलप्रमाणे परिच्छेद क्रमांक २ नुसार नियुक्त केलेल्या समितीस कामकाजानिमित्त Untied निधी खालील लेखाशिर्षाखाली उपलब्ध करून देण्यात येईल.

लेखाशिर्ष- महसूल व वन विभाग - मागणी क्रमांक सी-५
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण
०२, समाजकल्याण
१०४, वृध्द, अपंग व निराश्रीतांचे कल्याण
(००) (०५) शेतकरी आत्महत्या रोखण्यासाठी करावयाच्या उपाययोजना

७. आत्महत्याप्रवण भागातील आत्महत्या रोखण्याच्या अनुषंगाने वरील संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी वरील योजनांच्या अंमलबजावणी करण्याबाबत योग्य ती कार्यवाही तातडीने करावी.

८.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७२४१३३८२०८५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Rajendra Narayan Pimpale

Digitally signed by Rajendra Narayan Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Narayan Pimpale
Date: 2015.07.24 13:43:53 +05'30'

**(राजेंद्र ना. पिंपळे )**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) यवतमाळ व उस्मानाबाद जिल्ह्यातील सर्व उप विभागाकरीता नियुक्त केलेले सचिव दर्जाचे अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) सर्व विभागीय आयुक्त
४) सर्व जिल्हाधिकारी
५) जिल्हाधिकारी यवतमाळ व उस्मानाबाद यांना कळविण्यात येते की, स्थापन करण्यात आलेली जिल्हा / ग्राम स्तरीय समिती, बळीराजा चेतना अभियान व विशेष कक्ष स्थापन करणे या अनुषंगाने पुढील कार्यवाही करण्यास्तव अग्रेषित.

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) निवडनस्ती म-७ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.